**लातूर पशुसंवर्धन विभागासाठी लातूर मुख्यालयी विभागीय पशुरोग निदान प्रयोगशाळा स्थापन करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकःविपनि-२०२१/प्र.क्र.२८/पदुम-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २४ जुलै, २०२३

**प्रस्तावना :-**

सद्य:स्थितीत महाराष्ट्र राज्यात पशुसंवर्धन विभागांतर्गत पुणे येथे पश्चिम विभागीय रोग निदान प्रयोग शाळा तसेच रोग अन्वेषण विभाग औंध, पुणे या राज्यस्तरीय संस्था कार्यरत असून, लातूर विभाग वगळता राज्यामध्ये नागपूर, अकोला, औरंगाबाद, नाशिक, पुणे, कोल्हापूर व चिपळूण अशा एकूण ०७ ठिकाणी विभागीय पशुरोग निदान प्रयोगशाळा कार्यरत आहेत. लातूर विभागासाठी आवश्यक प्रयोगशाळेची जबाबदारी विभागीय पशुरोग निदान प्रयोगशाळा, औरंगाबाद यांच्यावर सोपविण्यात आलेली आहे. या प्रयोगशाळांच्या माध्यमातून संबंधित विभागातील जिल्ह्यांमध्ये पशु/पक्षांमध्ये उद्भवणाऱ्या विविध सांसर्गिक रोगाचे सर्व्हेलन्स, सनियंत्रण व प्राथमिक रोग निदान करण्यात येते. तसेच रोग प्रादुर्भावाबाबत पशुवैद्यकांना / पशुपालकांना मार्गदर्शन व प्रशिक्षण दिले जाते.

तथापि, लातूर विभागामध्ये लातूर, उस्मानाबाद, नांदेड व हिंगोली या जिल्ह्यांचा समावेश असून २० व्या पशुगणनेनुसार गाय व म्हैस वर्ग २१.११ लक्ष, मेंढ्या १.५१ लक्ष, शेळ्या ८.३९ लक्ष तसेच कुक्कुट १८ लक्ष एवढे पशुधन व कुक्कुट असून लातूर विभागासाठी स्वतंत्र प्रयोगशाळा नसल्याने या जिल्ह्यांतील पशुपालकांना पशुपक्ष्यांमधील रोग नमुने तपासणीसाठी औरंगाबाद अथवा पुणे येथील अतिदूरवरच्या प्रयोगशाळांवर अवलंबून रहावे लागते. लातूर विभागात विभागीय प्रयोगशाळा स्थापन केल्यास, उच्च दर्जाची अत्याधुनिक पशुवैद्यकीय सेवा उपलब्ध होऊन रोग निदानाचे कार्य जलदगतीने व वेळेत होईल. यामुळे पशुधन व पक्ष्यांमध्ये होणाऱ्या रोग प्रादुर्भावावर नियंत्रण करता येईल. परिणामी शेतकरी पशुपालकांची गैरसोय दूर होऊन त्यांचे होणारे आर्थिक नुकसान टाळता येईल. यासाठी लातूर विभागासाठी विभागीय पशुरोग निदान प्रयोगशाळा स्थापन करण्याबाबत विभागाने सादर केलेल्या प्रस्तावास दि.१३.०६.२०२३ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार लातूर मुख्यालयी विभागीय पशुरोग निदान प्रयोगशाळा स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

उक्त वस्तुस्थिती विचारात घेता लातूर मुख्यालयी विभागीय पशुरोग निदान प्रयोगशाळा स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रयोगशाळेसाठी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे नियमित स्वरूपातील ७ पदे व बाह्यस्त्रोताद्वारे भरावयाची ४ पदे अशा एकूण ११ पदांस मंजुरी देण्यात येत आहे:-

| अ .क्र. | पदनाम | निर्माण करावयाच्या पदांची संख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन गट -अ | २ | एस २२ (रु.६००००-१९०८००) |
| २ | पशुधन विकास अधिकारी गट-अ | १ | एस-२०: (रु.५६१००-१७७५००) |
| ३ | सहाय्यक पशुधन विकास अधिकारी गट -क | १ | एस १० - (रु.२९२००-९२३००) |
| ४ | पशुधन पर्यवेक्षक गट -क | १ | एस- ८ ( रु.२५५००-८११००) |
| ५ | कनिष्ठ लिपिक गट -क | १ | एस -६ (रु. १९९००-६३२००) |
| ६ | प्रयोगशाळा सहाय्यक गट -क | १ | एस-७ ( रु. २७१००-६९१००) |
| ७ | वाहन चालक गट -क | १ | बाह्यस्त्रोताद्वारे |
| ८ | परिचर गट - ड | ३ | |
| | **एकूण** | **११** | |

तसेच बाहययंत्रणेद्वारे पदांच्या सेवा उपलब्ध करून घेताना वित्त विभागाच्या दि.२७.०४.२०२२ च्या शासन निर्णयातील तरतुदींचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. विभागीय पशुरोग निदान प्रयोगशाळा, लातूर स्थापनेसाठी येणारा वार्षिक आवर्ती खर्च रु.५६.२८ लक्ष एवढा प्रस्तावित आहे. तसेच अनावर्ती खर्च रु.१९५.०० लक्ष असा एकूण रु.२५१.२८ लक्ष एवढ्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. सदर आवर्ती व अनावर्ती खर्चाचा तपशील प्रपत्र-अ मध्ये नमूद केला असून प्रपत्र सोबत जोडले आहे.

४. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, विभागीय पशुरोग निदान प्रयोगशाळा, लातूर यांना कोषागार, लातूर येथुन उपरोक्त पदांचे वेतन व भत्ते आहरित करण्यासाठी याव्दारे, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रयोगशाळेच्या इमारतीच्या बांधकामावरील खर्च जिल्हा वार्षिक योजनेतून भागविण्यात यावा.

६. नविन पदनिर्मितीच्या तसेच, बाहययंत्रणेव्दारे सेवा उपलब्ध करून घेण्याच्या अनुषंगाने वेतन भत्त्यांवरील व इतर खर्च राज्यस्तरीय योजनेतून खालील लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

**लेखाशिर्ष**

मागणी क्र. डी-४,
२४०३,पशुसंवर्धन
(०४) पशुरोगाची तपासणी
(०४) (०१) पशुरोगांची तपासणी अनिवार्य,
संकेतांक २४०३ ०१७८

७. नवनिर्मित पदे भरण्यासंदर्भात आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.४३८/२०२३/ व्यय-२, दि.०४.०७.२०२३ यांच्या सहमतीने तसेच, वित्त विभाग पृष्ठांकन क्र.पदनि-२०२३/प्र.क्र.२२/ आपुक, दि.२७.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या मा. उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.१७.०४.२०२३ रोजी पार पडलेल्या सन २०२३ च्या दुस-या बैठकीत प्रपत्र-अ मधील पद निर्मितीस प्रदान करण्यात आलेल्या मान्यतेअन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणक सांकेतांक २०२३०७२४१२२०५५०६०१ आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

CHANDRAKALA DEVRAM GAVIT

Digitally signed by CHANDRAKALA DEVRAM GAVIT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=db6efff5f9cbf5f55184ebe2b33934e3a1ad06cbfbad22ff0cbcf88f3c89e1e4, pseudonym=6AC1004D14020B1CF4AC873549BD26748DFEB090, serialNumber=B16E6FECB684A6091AF2BD729716C8F32004FESEF01B9D220C1A6D0EDDC63E52, cn=CHANDRAKALA DEVRAM GAVIT
Date: 2023.07.24 12:23:17 +05'30'

**( चंद्रकला गावित )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
२. आयुक्त, पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. सहआयुक्त, पशुसंवर्धन रोग अन्वेषण विभाग, पुणे
४. प्रादेशिक सहआयुक्त, पशुसंवर्धन, लातूर विभाग, लातूर
५. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
६. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
७. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, लातूर.
८. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, लातूर.
९. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.

१०. वित्त विभाग (कार्यासन आपुक/ व्यय-२) मंत्रालय, मुंबई.

११. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर.

१२. कक्ष अधिकारी (पदुम-१ व १६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३. निवड नस्ती/ पदुम-२.

शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. विपनि-**२०२१**/प्र.क्र.**२८**/पदुम-**२** दि.२४.०७.२०२३

## प्रपत्र- अ

## लातूर विभागासाठी लातूर मुख्यालयी स्वतंत्र विभागीय पशुरोग निदान प्रयोगशाळा स्थापन करण्यासाठी येणाऱ्या आवर्ती व अनावर्ती खर्चाचा तपशील

(रु.लाखात)

| अ.क्र. | तपशील | विभागीय पशुरोग निदान प्रयोगशाळा स्थापनेसाठी येणारा वार्षिक खर्च | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ |
| | **आवर्ती खर्च** | | |
| १ | आस्थापना/ वेतनावरील खर्च: | ५०.८८ | |
| २ | सादील (कार्यालयीन व इतर खर्च) | ५.४० | |
| | **एकूण आवर्ती खर्च** | **५६.२८** | |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | अनावर्ती खर्च<br>१) प्रयोगशाळेसाठी जागा<br>२) प्रयोगशाळा इमारत बांधकाम<br>३) फर्निचर<br>४) यंत्र सामुग्री<br>५) मोटार वाहन खरेदी | <br>---<br>७५.००<br>१०.००<br>१००.००<br>१०.०० | विभागाची जागा उपलब्ध आहे |
| | **एकूण अनावर्ती खर्च** | १९५.०० | |
| | **एकूण खर्च (आवर्ती+अनावर्ती)**<br>(१९५.००+५६.६८) | १९५.००+५६.२८=<br>**२५१.२८** | |